**भैरवनाथ आदिवासी सहकारी उपसा जलसिंचन योजना, खैरगाव ता. इगतपुरी, जि. नाशिक या कामास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**मृद व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: उसिंयो-२०२३/प्र.क्र-१५०/जल-१**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: ०६ मार्च, २०२४.

वाचा:

१. जलसंपदा विभाग शासन निर्णय क्र. मापदंड २०१७/(४५२/२०१७)/लपा-२, दि. १३.०७.२०१८
२. अप्पर आयुक्त जलसंधारण तथा मुख्य अभियंता, मृद व जलसंधारण प्रादेशिक क्षेत्र, पुणे यांचे पत्र क्र .प्रशा-३/१४६४, दि .२००.३२०२.३

प्रस्तावना-

नाशिक जिल्ह्यातील इगतपुरी तालुक्यातील खैरगाव हे गाव दारणा धरणाच्या वरील बाजूस दारणा नदीच्या तीरावर आहे. या नदीवर सन १९१५ मध्ये दारणा धरण बांधण्यात आले. खैरगाव हे गाव दारणा जलाशयालगत आहे, मात्र इगतपुरी तालुक्याचे संपुर्ण क्षेत्र डोंगराळ व आदिवासी असल्याने, धरणापासून थेट कालवे काढलेले नाहीत. तसेच जलाशयालगतच्या क्षेत्रास उपसा सिंचनाच्या सोई उपलब्ध झालेल्या नाहीत. सन २०१० मध्ये दारणा नदीवरच दारणा धरणाच्या व खैरगाव गावाच्या वरील बाजूस भावली धरण बांधण्यात आले आहे. भावली धरणापासून थेट कालवे काढलेले नसल्याने धरणाचे पाणी अत्यंत जवळ उपलब्ध असूनही सदर पाणी नदीपात्रालगतचे शेतकरी उपसा सिंचनाद्वारे वापरु शकलेले नाहीत. त्यामुळे गावातील शेतकऱ्यांनी भैरवनाथ आदिवासी सहकारी संस्था, खैरगाव ही संस्था स्थापन केली असून शासकीय खर्चाने उपसा योजना कार्यान्वित करुन देण्याबाबत मागणी केलेली आहे. भैरवनाथ आदिवासी सहकारी उपसा जलसिंचन योजना, खैरगाव ता. इगतपुरी, जि. नाशिक योजने अंतर्गत एकूण २३६.१५ हे. क्षेत्र सिंचनाखाली आणणे नियोजीत आहे. त्यास अनुसरुन सदर योजनेस प्रशासकीय मान्यता देणेबाबत शासनाचे विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :**

भैरवनाथ आदिवासी सहकारी उपसा जलसिंचन योजना, खैरगाव ता. इगतपुरी, जि. नाशिक या कामाची एकूण किंमत **रुपये रू. ७,०८,१८,३१६/- (अक्षरी रुपये सात कोटी आठ लक्ष अठरा हजार तीनशे सोळा फक्त)** या प्रस्तावास खालील अटीं व शर्तीच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. या योजनेच्या मूळ अंदाजपत्रकानुसार तरतूद सोबत “जोडपत्र अ” मध्ये सादर करण्यात येत आहे.

१. स्थापत्य, यांत्रिकी व उर्जा विषयक उपांगाचे संकल्पनास/आराखडयास सक्षम प्राधिकाऱ्याची मान्यता घेऊन त्यानुसार अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता प्रदान करण्यात यावी.
२. अंदाजपत्रकात वहन व्यय (Conveyance Losses) विचारात घेणे आवश्यक असून त्यानुसार निव्वळ पाणी उपलब्धता परिगणित करणे अपेक्षित आहे.

३. वरीलप्रमाणे प्रकल्पनिहाय मंजूर किंमतीच्या मर्यादेत प्रकल्पाचे काम पूर्ण करण्यात यावे.

४. निधीची मंजूरी मिळाल्याशिवाय या योजनेच्या कामावर कोणत्याही प्रकारचा खर्च करु नये.

५. प्रस्तावित किंमतीच्या मर्यादित योजनेचे काम पूर्ण करण्यात यावे.

६. शासन निर्णय दिनांक ३१ जुलै, २००० व शासन निर्णय दि. २०.०७.२०१८ नुसार लाभधारकांची पाणी वापर संस्था स्थापन करण्यात यावी.

७. प्रकल्पाचे काम पूर्ण झाल्यावर सदर प्रकल्प देखभाल दुरुस्तीसाठी वरीलप्रमाणे स्थापित पाणी वापर संस्थेकडे हस्तांतरीत करण्यात यावा.

८. वरीलप्रमाणे प्रकल्पाचे हस्तांतरण झाल्यानंतर देखील दुरूस्तीचा खर्च लाभार्थ्यांकडून करण्यात यावा.

९. योजनेचे सिंचन क्षेत्रानुसार गटनंबर निहाय लाभधारकांची यादी व नकाशा तांत्रिक मान्यतेपूर्वी सक्षम प्राधिकाऱ्याकडे सादर करावा.

१०. प्रकल्पासाठी अधीक्षक अभियंता/प्रादेशिक जलसंधारण अधिकारी यांनी कार्यस्थळी भेट देऊन स्थळ निश्चित करुन प्रमाणित करणे आवश्यक आहे.

११. कामाचा खर्च उपलब्ध अनुदानातून प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत करण्यात यावा व नियोजित वेळेत काम पूर्ण करण्यात यावे.

१२. काम पूर्ण झाल्यानंतर त्याबाबतचा पूर्णत्वाचा अहवाल शासनास त्वरीत सादर करावा.

१३. काम पूर्ण झाल्यानंतर कामाची गुणनियंत्रणाच्या दृष्टीने विभागाच्या दक्षता व गुणनियंत्रण पथकाकडून तपासणी करण्यात यावी.

१४. आर्थिक दायित्व निर्माण होईल अशा नवीन घटकांचा शासन मान्यतेशिवाय प्रकल्पात समावेश करण्यात येऊ नये.

१५. तांत्रिक मान्यतेपुर्वी सर्व योजनांना सक्षम प्राधिकाऱ्याकडुन वहन अंतर प्रस्ताव मंजुर करुन घेण्यात यावा.

१६. सदर कामाची अंमलबजावणी करतांना दर्जा व गुणवत्ता उत्कृष्ठ ठेवण्याची जबाबदारी संबंधीत क्षेत्रीय अधिकाऱ्यांची राहील.

१७. जिल्हा जलसंधारण अधिकारी व प्रादेशिक जलसंधारण अधिकारी यांनी काम पुर्ण झाल्यावर प्रमाणित करणे आवश्यक राहील.

१८. शासन परिपत्रक क्र.प्रमा-२०१३/(७८५/१३)/ सिं. व्य. (कामे) दि. ०१.०१.२०१५ मधील मार्गदर्शक सूचना नुसार अभिलेखे ठेवणे व कार्यवाही करणे बंधनकारक आहे.

१९. प्रकल्पाच्या उपशिर्षनिहाय मंजूर किंमतीच्या मर्यादेत व नियोजनानुसार काम पुर्ण करण्यात यावे.

२०. आवश्यकतेनुसार अंदाजपत्रकात गृहीत धरलेले आराखडे / संकल्पने, बाह्य दरसूची बाबी व वहन अंतरे सक्षम स्तरावर तपासून अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता प्रदान करावी.

२१. सदर योजनेच्या प्रशासकीय मान्यतेच्या प्रस्तावास वित्त विभागाने खालील अटींच्या अधीन राहून सहमती दर्शवली आहे. खालील अटींची पूर्तता करण्याची सर्वस्वी जबाबदारी संबंधित जिल्हा जलसंधारण अधिकारी यांची राहील.

i. प्रस्तुत योजनेचे काम विहित वेळेत उपलब्ध निधीतून प्रशासकीय मान्यता किंमतीमध्ये पूर्ण करण्याची दक्षता विभागाने घ्यावी. शासन मान्यतेशिवाय नवीन घटकांचा समावेश योजनेमध्ये करण्यात येऊ नये.
ii. योजनेवर लाभधारकांची पाणी वापर संस्था विहीत वेळेत स्थापन करण्यात यावी.
iii. विभागाने प्रचलित शासन निर्णय, मार्गदर्शक तत्त्वे, वित्तीय अधिकार मर्यादा यांची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्याची जबाबदारी विभागाची राहील.
iv. प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रिक बाबी अथवा निविदा विषयक क्षेत्रीय स्तरावरील निर्णयास मान्यता गृहीत धरली जाणार नाही.

२.०. या योजनेच्या कामावर होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**लेखाशिर्ष:-**
**(०१)(१८)राज्य एकत्रित निधी**
**अंतर्गत लहान पाटबंधारे योजना**
**(राज्यस्तर योजना) (कार्यक्रम)**
**५३, मोठी बांधकामे**
**लेखाशिर्ष ४७०२-७७२१**

**३.०** सदर शासन निर्णय आदिवासी विकास विभाग व वित्त विभाग यांच्या सहमतीने अनुक्रमे आदिवासी विकास विभागाचा अनौ.सं.क्र. ३२/का.५, दि. २०.०४.२०२३ व वित्त विभागाचा अनौ. सं.क्र. १५६/२०२४/व्यय-१४, दि. १५.०२.२०२४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन, त्याचा सांकेतांक क्रमांक २०२४०३०६१८१७३५३६२६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUNIL MAHADEV KALE

Digitally signed by SUNIL MAHADEV KALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOIL AND WATER CONSERVATION DEPARTMENT, 2.5.4.20=d5c8d23e6cc09fb2bb4aa1777dadbfbb405c54e877afe06798f54168b9f08b98, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=30B26A65349009C49CCA04C5AECBC47F35D7524B402BBD5D7FA6DDD215CFF18D, cn=SUNIL MAHADEV KALE
Date: 2024.03.06 18:26:37 +05'30'

**(सु. म. काळे)**
**मुख्य अभियंता तथा सह सचिव,**
**महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन,मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री, यांचे अप्पर मुख्य सचिव.
३) मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद/ विधानसभा, विधान मंडळ सचिवालय, विधानभवन,मुंबई.

४) सर्व मा. संसद सदस्य, विधान मंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य.
५) सर्व मा. मंत्री/ राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
६) मा. मंत्री ( मृद व जलसंधारण) यांचे खाजगी सचिव
७) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य.
८) सर्व मंत्रालयीन विभागांचे अप्पर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव.
९) मा. सचिव ( मृद व जलसंधारण) यांचे स्वीय सहाय्यक
१०) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परिक्षण), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
११) आयुक्त मृद व जलसंधारण, जल आयुक्तालय, छत्रपती संभाजीनगर.
१२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र जलसंधारण महामंडळ, छत्रपती संभाजीनगर.
१३) अप्पर आयुक्त जलसंधारण तथा मुख्य अभियंता, मृद व जलसंधारण प्रादेशिक क्षेत्र, पुणे.
१४) प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, नाशिक.
१५) प्रादेशिक दक्षता गुणनियंत्रण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, पुणे.
१६) जिल्हा जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, नाशिक.
१७) कार्यासन अधिकारी (कार्यासन-५), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८) कार्यासन अधिकारी (जल-४), जलसंधारण विभाग,मंत्रालय,मुंबई.
१९) निवडनस्ती (जल-१).

**मृद व जलसंधारण विभाग**

**जोडपत्र 'अ'**

**भैरवनाथ आदिवासी सहकारी उपसा जलसिंचन योजना, खैरगाव ता. इगतपुरी, जि. नाशिक या कामास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत योजनेचा गोषवारा..**

**शासन निर्णय क्रमांक: उसिंयो-२०२३/प्र.क्र- १५०/जल-१, दिनांक ०६ मार्च, २०२४.**

| Sr. No | Name of Work | Estimated Cost |
|---|---|---|
| I | Civil Works | |
| १ | Preliminary Survey | २,८४,८४८ |
| २ | Jack well & Pump house, Approach, Intake Pipe & Intake well | १,११,३०,२८१ |
| ३ | Rising main, Distribution system, Delivery chamber, Pumping machinery | ३,९६,६७,६७८ |
| ४ | Electrical charges | ३०,३६,११३ |
| ५ | Road to Jack well | १२,०७,८८९ |
| | Total Rs. | ५,५३,२६,८०९ |
| | Add GST १८% | ९९,५८,८२५.६२ |
| II | Monitoring Charges १०% | ५५,३२,६८०.९ |
| | Total Cost of the project Rs. | **७,०८,१८,३१६.००** |

एकुण रक्कम **रू. ७,०८,१८,३१६/- (अक्षरी रुपये सात कोटी आठ लक्ष अठरा हजार तीनशे सोळा फक्त)**

SUNIL MAHADEV KALE

Digitally signed by SUNIL MAHADEV KALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOIL AND WATER CONSERVATION DEPARTMENT, 2.5.4.20=d5c8d23e6cc09fb2bb4aa1777dadbfbb405c54e877afe06798f54168b9f08b98, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=30B26A65349009C49CCA04C5AECBC47F35D7524B402BBD5D7FA6DDD215CFF18D, cn=SUNIL MAHADEV KALE
Date: 2024.03.06 18:26:55 +05'30'

**(सु. म. काळे)**
**मुख्य अभियंता तथा सह सचिव,**
**महाराष्ट्र शासन**